अवर सचिव पदावरून उप सचिव पदावर तात्पुरती पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः उसप-१३२२/प्र.क्र.२/का.१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २० मे, २०२२

**आदेश**

खालील अवर सचिवांना या आदेशाच्या दिनांकापासून उप सचिव पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे.-

| अ.क्र. | अवर सचिवांचे नाव | जात प्रवर्ग | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नती नंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. प्रकाश राऊ कदम | खुला | कृषी व पदुम विभाग | कृषि व पदुम विभाग |
| २ | श्री. विवेक माधव पाटील | इमाव | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ३ | श्री. अजय पांडुरंग वाघ | खुला | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (प्रतिनियुक्ती) | प्रपत्र बढती - मा.मुख्यमंत्री सचिवालय |
| ४ | श्री. सुनिल श्रीधरराव कोठेकर | खुला | आदिवासी विकास विभाग (प्रतिनियुक्ती) | प्रपत्र बढती - मा.मंत्री, महसूल कार्यालय |
| ५ | श्री. दिलीप नंदकुमार देशपांडे | खुला | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ६ | श्रीमती समृध्दी विजय अनगोळकर | खुला | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ७ | श्रीमती विद्या हेमंत वाघमारे | खुला | वित्त विभाग | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| ८ | श्री. रविंद्र ईश्वर गिरी | भ.ज.ब | ग्राम विकास विभाग | ग्राम विकास विभाग |
| ९ | श्री. जयंत फागोराव जनबंधू | अ.जा. | गृह विभाग | इतर मागास बहुजन कल्याण विभाग |
| १० | श्री. रविंद्र तुकाराम जाधव | अ.जा. | आदिवासी विकास विभाग | महसूल व वन विभाग |
| ११ | श्री. राजेंद्र पांडुरंग वाघ | खुला | सामान्य प्रशासन विभाग | नियोजन विभाग |
| १२ | श्री. हर्षवर्धन तुकाराम जाधव | खुला | नगर विकास विभाग | महसूल व वन विभाग |

| अ.क्र. | अवर सचिवांचे नाव | जात प्रवर्ग | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नती नंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १३ | श्री. प्रकाश शामराव इंदलकर | खुला | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| १४ | श्री. सुनिल सुर्यकांत हांजे | खुला | ग्राम विकास विभाग | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |
| १५ | श्री. सुरेश ज्ञानदेव रेडेकर | खुला | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| १६ | श्री. प्रल्हाद शंकर रोडे | खुला | जलसंपदा विभाग (प्रतिनियुक्ती) | प्रपत्र बढती - स्मार्ट सिटी प्रोजेक्ट, कल्याण-डोंबिवली महानगर पालिका, जि.ठाणे |
| १७ | श्रीमती सविता अजित जावळे | खुला | कृषि व पदुम | मा.मुख्य राज्य माहिती आयोग कार्यालयातील उप सचिव या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती. |
| १८ | श्री. विवेक शंकर कुंभार | खुला | नगर विकास विभाग | महसूल व वन विभाग |
| १९ | श्री. चंद्रकांत अरुण विभूते | खुला | पर्यावरण विभाग (प्रतिनियुक्ती) | प्रपत्र बढती- शास्त्रज्ञ श्रेणी-१ (पर्यावरण विभाग) |
| २० | श्री. दिपक उत्तमराव पोकळे | खुला | गृह विभाग | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| २१ | श्री. विजय तुलाराम इंगोले | खुला | सार्वजनिक आरोग्य विभाग (प्रतिनियुक्ती) | प्रपत्र बढती - मा.मंत्री, मा.मंत्री, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, क्रिडा व युवक कल्याण |
| २२ | श्री. तुषार वसंत महाजन | खुला | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |
| २३ | श्री.सचिन दत्तात्रय सहस्त्रबुध्दे | खुला | नगर विकास विभाग | इतर मागास बहुजन कल्याण विभाग |
| २४ | श्री. महेश अशोकराव वरुडकर | खुला | महिला व बाल विकास विभाग | आयुक्त, राज्य कामगार विमा योजना मुंबई यांच्या कार्यालयातील संचालक (प्रशासन) या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती. |
| २५ | श्री.रविंद्र दिगंबरराव औटे | खुला | आदिवासी विकास विभाग | गृह विभाग |
| २६ | श्री.श्रीकांत चंद्रकांत आंडगे | खुला | कृषी व पदुम विभाग | गृह विभाग |
| २७ | श्रीमती आशाराणी उत्तम पाटील | खुला | अल्पसंख्याक विकास विभाग | अल्पसंख्याक विकास विभाग |

| अ.क्र. | अवर सचिवांचे नाव | जात प्रवर्ग | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नती नंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| २८ | श्रीमती लिना आशिष संख्ये | भ.ज.ड | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| २९ | श्री.अजित तुकाराम सासुलकर | खुला | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग | सार्वजनिक आरोग्य विभाग |

२. सर्वश्री अजय पांडुरंग वाघ, सुनिल श्रीधरराव कोठेकर, प्रल्हाद शंकर रोडे, चं.अ.विभूते व विजय तुलाराम इंगोले यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०, परिशिष्ट-२, अट क्र.१८ नुसार तात्पुरत्या स्वरूपात प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहील. त्यानंतर सदर अधिकाऱ्यानी मंत्रालयीन विभागात हजर होणे आवश्यक राहील.

३. श्रीमती स.अ.जावळे, अवर सचिव यांची मुख्य आयुक्त, राज्य माहिती आयोग कार्यालयातील उप सचिव पदावर व श्री.म.अ.वरुडकर, अवर सचिव यांची उपसचिव पदावर पदोन्नतीनंतर आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांच्या कार्यालयातील संचालक (प्रशासन) या पदावर आदेशांच्या दिनांकापासून २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-दोन) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन श्रीमती जावळे, उपसचि व श्री.वरुडकर, उपसचिव यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती ते सध्या कार्यरत असलेला विभाग व प्रतिनियुक्तीचे पद ज्या विभागाच्या अखत्यारित आहे त्या विभागाने ठरवाव्यात.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६-ब यांच्या शासन निर्णय दि.७.५.२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

५. सदर अधिकाऱ्यांना उप सचिव पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.-

(अ) सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

(आ) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(इ) सदर तात्पुरती पदोन्नती प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी रुजू होईपर्यंत किंवा पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिन्यासाठी यांपैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल.

(ई) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांची तात्पुरती पदोन्नती संपुष्टात येईल.

(उ) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी उप सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांला पदावनत करण्याच्या अधीन राहून सदर तात्पुरत्या पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

(ऊ) सदर पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७, कक्ष अधिकारी संवर्गाच्या ज्येष्ठतेबाबत मा.उच्च न्यायालयाने पारीत केलेल्या दि.६.८.२०१८ रोजीच्या आदेशाबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२५१८१/२०१८ व त्यातील आय.ए. क्र.२५९०/२०१९ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(ए) सदर तात्पुरती पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७८/२०२१ यामधील आय.ए.(स्टॅम्प) क्र. १०९१०/२०२१ व १०९११/२०२१ तसेच रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०९०९/२०२१ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

६. उप सचिव पदावर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी हे आदेश निघाल्याच्या तारखेपासून तीस दिवसामध्ये उप सचिव पदावर रुजू होणे आवश्यक आहे.

७. पदोन्नत अधिकाऱ्यांना संबंधित विभागाने उप सचिव पदावर रूजू करून घेऊन त्याबाबतच्या आदेशाची प्रत या विभागास तत्काळ अवगत करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०५२०१६२७०९७३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUCHITA MOHAN MAHADIK

Digitally signed by SUCHITA MOHAN MAHADIK
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6578e224c4a0d2c9bfb7e7e33b474757c1425d0a03e653bc4f0a25b70698158e, serialNumber=e146a6ddc8fb6681d49a5099661d41639da6c568419f071bb9cdfd8a2e08058c, cn=SUCHITA MOHAN MAHADIK
Date: 2022.05.20 16:31:23 +05'30'

**( सु.मो.महाडिक )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव- सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग
५. संबंधित मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
६. संबंधित अधिकारी, विभागामार्फत

७. सह/उपसचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई
यांना विनंती करण्यात येते की, श्रीमती स.अ.जावळे, अवर सचिव यांची मुख्य आयुक्त, राज्य माहिती आयोग कार्यालयातील उप सचिव पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती साप्रवि कार्या/६ यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

८. सह/उपसचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
यांना विनंती करण्यात येते की ,श्री.म.अ.वरुडकर, अवर सचिव यांची राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांच्या कार्यालयातील संचालक (प्रशासन) या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती सार्वजनिक आरोग्य विभागांशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

९. निवड नस्ती कार्या१४/